राज्य सुरक्षा आयोग व पोलीस तक्रार प्राधिकरणांसाठी पदनिर्मिती...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एमआयएस-३६१४/प्र.क्र.१३/पोल-३

मंत्रालय, जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१, कफ परेड, मुंबई-४०० ००५

तारीख: १० सप्टेंबर २०१४

**प्रस्तावना**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हिल) क्रमांक-३१०/१९९६ मध्ये दिनांक २२ सप्टेंबर २००६ रोजी दिलेल्या निदेशाची तरतूद महाराष्ट्र पोलीस अधिनियम, १९५१ मध्ये करण्याकरिता मंत्रिमंडळ उपसमितीने केलेल्या शिफारशींवर मंत्रिमंडळाने दिनांक १५ जानेवारी २०१४ रोजी निर्णय घेतला आहे. मंत्रिमंडळ निर्णयानुसार राज्य सुरक्षा आयोग, पोलीस आस्थापना मंडळे, पोलीस तक्रार प्राधिकरणांची स्थापना तसेच इतर निदेशांची तरतूद करण्यासाठी महाराष्ट्र पोलीस (सुधारणा आणि पुढे चालु ठेवणे) अधिनियम, २०१४ (सन २०१४ चा अधिनियम क्रमांक-२४ ) दिनांक १ फेब्रुवारी २०१४ पासून अंमलात आला आहे.

राज्य सुरक्षा आयोग, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण व विभागस्तरीय पोलीस तक्रार प्राधिकरणांसाठी अनुक्रमे ७, २५ व १०१ अशी एकूण १३३ नियमित पदे तसेच अनुक्रमे २, ५ व २४ अशी एकूण ३१ पदे बाहययंत्रणेद्वारे निर्माण करण्यास व त्यावरील आवर्ती रु.३८४.३३ लक्ष आणि अनावर्ती रु.२५३.५७ लक्ष अशा एकूण रु.६३७.९० लक्ष एवढया खर्चास मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यानुसार राज्य सुरक्षा आयोग, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण व विभागस्तरीय पोलीस तक्रार प्राधिकरणांसाठी पदनिर्मिती करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

राज्य मंत्रिमंडळाने दिनांक १५ जानेवारी २०१४ च्या बैठकीमध्ये मान्यता दिल्यानुसार, राज्य सुरक्षा आयोग, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण व विभागस्तरीय पोलीस तक्रार प्राधिकरणांसाठी खालीलप्रमाणे पदनिर्मिती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**१) राज्य सुरक्षा आयोग -**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | प्रशासकीय अधिकारी | १ | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,४०० |
| २ | निम्नश्रेणी लघुलेखक | १ | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,३०० |

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| ३ | वरिष्ठ लिपीक | १ | ५,२००-२०,२०० + श्रे.वे. २,४०० |
| ४ | लिपीक टंकलेखक | २ | ५,२००-२०,२०० + श्रे.वे. १,९०० |
| ५ | शिपाई (बाहय यंत्रणेद्वारे) | २ | ४,४४०- ७,४४० + श्रे.वे. १,३०० |
| -- | एकूण ... | **७** (५ नियमित + २ बाहय यंत्रणेद्वारे) | -- |

**२) राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण -**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | मुख्य प्रशासकीय अधिकारी | १ | १५,६००-३९,१०० + श्रे.वे. ५,४०० |
| २ | प्रशासकीय अधिकारी | १ | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,४०० |
| ३ | गुन्हे अन्वेषण, गुप्तवार्ता दक्षता, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग व राज्य मानवी हक्क आयोगामधील कामाचा अनुभव असलेले सेवानिवृत्त राजपत्रित पोलीस अधिकारी | ६ | अंतिम वेतन वजा पेन्शान सुत्राप्रमाणे |
| ४ | अधिक्षक | १ | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,३०० |
| ५ | उच्चश्रेणी लघुलेखक | १ | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,८०० |
| ६ | निम्नश्रेणी लघुलेखक | १ | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,३०० |
| ७ | वरिष्ठ लिपीक | ६ | ५,२००-२०,२०० + श्रे.वे. २,४०० |
| ८ | लिपीक-टंकलेखक | ३ | ५,२००-२०,२०० + श्रे.वे. १,९०० |
| ९ | वाहन चालक | १ (बाहय यंत्रणेद्वारे) | ५,२००-२०२०० + श्रे.वे. १,९०० |
| १० | शिपाई | ४ (बाहय यंत्रणेद्वारे) | ४,४४०-७,४४० + वे.श्रे. १,३०० |
| -- | एकूण ... | **२५** ( २० नियमित + ५ बाहय यंत्रणेद्वारे ) | -- |

**३) विभाग स्तरीय पोलीस तक्रार प्राधिकरण -**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | प्रशासकीय अधिकारी | ६<br>(प्रत्येक विभागासाठी एक) | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,४०० |
| २ | गुन्हे अन्वेषणाच्या कामाचा अनुभव असलेले सेवानिवृत्त राजपत्रित पोलीस अधिकारी | ३५<br>(प्रत्येक जिल्हयासाठी एक) | अंतिम वेतन वजा पेन्शन सुत्राप्रमाणे |
| ३ | अधिक्षक | ६<br>(प्रत्येक विभागासाठी एक) | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,३०० |
| ४ | उच्चश्रेणी लघुलेखक | ६<br>(प्रत्येक विभागासाठी एक) | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,८०० |
| ५ | निम्नश्रेणी लघुलेखक | ६<br>(प्रत्येक विभागासाठी एक) | ९,३००-३४,८०० + श्रे.वे. ४,३०० |
| ६ | वरिष्ठ लिपीक | ६<br>(प्रत्येक विभागासाठी एक) | ५,२००-२०,२०० + श्रे.वे. २,४०० |
| ७ | लिपीक-टंकलेखक | १२<br>(प्रत्येक विभागासाठी दोन) | ५,२००-२०,२०० + श्रे.वे. १,९०० |
| ८ | वाहन चालक | ६<br>( प्रत्येक विभागासाठी एक - बाहय यंत्रणेद्वारे) | ५,२००-२०,२०० + श्रे.वे. १,९०० |
| ९ | शिपाई | १८<br>( प्रत्येक विभागासाठी तीन - बाहय यंत्रणेद्वारे) | ४,४४०-७,४४० + वे.श्रे. १,३०० |
| -- | एकूण ... | **१०१**<br>(७७ नियमित + २४ बाहय यंत्रणेद्वारे) | -- |

२. प्रस्तुत कार्यालयांसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

३. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक-१९७०/व्यय-१२, दिनांक १९ ऑक्टोबर २०१३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच मंत्रिमंडळाच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१०१४५०२४४०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: CN = Charushila Chandrakant Tambekar, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.09.10 15:52:10 +05'30'

**चारुशीला तांबेकर**
शासनाच्या सहसचिव

प्रत,

१. अपर मुख्य सचिव , गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, वरळी, मुंबई,
७. सर्व अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
९. सर्व विशेष पोलीस महनिरिक्षक,महाराष्ट्र राज्य,
१०. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
११. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
१२. सर्व पोलीस उप महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य,
१३. सर्व पोलीस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य,
१४. सर्व पोलीस प्रशिक्षण विद्यालये, महाराष्ट्र राज्य,
१५. सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य,
१६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा वअनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर,
१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,

१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२०. वित्त विभाग (व्यय-७/वित्तीय सुधारणा-१) , मंत्रालय, मुंबई,
२१. सर्व सहसचिव/ उपसचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. निवडनस्ती- पोल-३